नाबार्डच्या ग्रामीण पायाभूत विकास निधी अंतर्गत शासकीय गोदाम बांधकामास निधी उपलब्ध करून देणेबाबत ( सन २०१६-१७ ).

**महाराष्ट्र शासन**
**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः गोदाबां १०१६/प्र.क्र.१२३६/नापु-१६ ब**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई- ४०० ०३२
तारीख: १० मार्च, २०१७

वाचा-

१. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/१०२४/प्र.क्र.२३२/नापु-१६-ब, दि.०२.०१.२०१३.
२. शासन निर्णय क्रमांक- गोदाबा -२०१२/२६२३/प्र.क्र.२५४/ भाग१/नापु-१६-ब, दिनांक ५ जुलै, २०१३.
३. शासन निर्णय क्रमांक-गोदाबां-१०१२/प्र.क्र.१६२/नापु-१६ब, दि. २८ ऑगस्ट ,२०१३.
४. शासन निर्णय क्र.गोदाबां-१०१३/प्र.क्र.४३७/नापु-१६-ब, दि. १७.०१.१४.
५. शासन निर्णय क्रमांक गोदाबा -१०१४/प्र.क्र.७३६/नापु-१६-ब, दि. २५.०८.१४
६. शासन निर्णय क्रमांक- गोदांबा-१०१५/प्र.क्र.९९० भाग १/नापु-१६-ब, दि.०९.०२.१६.
७. शासन निर्णय क्रमांक- गोदांबा-१०१५/प्र.क्र.९९० भाग १/नापु-१६-ब, दि.०९.०३.१६.
८. शासन निर्णय क्रमांक- गोदाबां -१०१६/प्र.क्र.१२३६/नापु-१६-ब, दि.१५.०७.२०१६.
९. शासन निर्णय क्रमांक- गोदाबां -१०१६/प्र.क्र.१२३६/नापु-१६-ब, दि.२१.११.२०१६.
१०. वित्त विभागाचा शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण-१०१५/ प्र.क्र.१८/ अर्थोपाय, दि. २५ ऑगस्ट, २०१५.

प्रस्तावना-

उक्त संदर्भाधीन शासन निर्णय दि.१५ जुलै २०१६ व दि. २१ नोव्हेंबर २०१६ अन्वये सन २०११-१२ ते सन २०१४-२०१५ मध्ये प्रशासकिय मान्यता देण्यात आलेल्या काही गोदाम बांधकामास निधी वितरित करण्यात आला होता. निधी खर्ची टाकण्याबाबत वारंवार पाठपुरावा करुनही त्यापैकी काही निधी संबंधित गोदाम बांधकामावर प्रत्यक्ष खर्ची टाकण्यात येत नसल्याने सोलापूर, नाशिक व चंद्रपूर जिल्हयांसाठी वितरित निधीपैकी काही निधी काढून घेण्याची व सदर निधी राज्यातील अन्य गोदाम बांधकामास वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

सन २०१६-१७ मध्ये यापुर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी अनवली जि.सोलापूर येथील कामासाठी वितरीत केलेल्या एकूण निधीपैकी अखर्चित रु.३४,४८,२१८/- इतका निधी काढून घेण्यात येत आहे.

सन २०१६-१७ मध्ये यापुर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी जीवती, वरोरा, गोंडपिंपरी, सिंदेवाही व कोरपणा जि. चंद्रपूर येथील कामासाठी वितरीत केलेल्या एकूण निधीपैकी अखर्चित रु.१,५७,४३,२३२/- इतका निधी काढून घेण्यात येत आहे.

सन २०१६-१७ मध्ये यापुर्वी वितरीत केलेल्या निधीपैकी देवळा जि.नाशिक येथील कामासाठी वितरीत केलेल्या निधीपैकी अखर्चित रु.२७३/- इतका निधी काढून घेण्यात येत आहे.

प्रशासकीय मान्यतेसंबंधित संदर्भाधीन संबंधित शासन निर्णयातील नमूद अटींच्या अधीन राहून पुढील विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे गोदाम बांधकामास निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

| अ.क्र. | जिल्हा | गोदामाचे नाव | प्रशासकीय मान्यतेच्या आदेशानुसार अंदाजित खर्च ( रू.) | यापूर्वी वितरित निधी (रू.) | सदर आदेशान्वये उपलब्ध करून देण्यात येत असलेला निधी (रू.) |
|---|---|---|---|---|---|
| १. | सिंधुदुर्ग | सावंतवाडी (कोळगाव) | १२७९७६३२ | १२७९७६३ | ४०,००,००० |
| २. | धुळे | देवपूर | ५०७९६६५८ | २५७८६७९६ | ४०,००,००० |
| ३. | रायगड | पनवेल | १९११३२०० | ० | ४०,००,००० |
| ४. | लातूर | नांदेड रोड, लातूर | १५६५४८१६ | ११३९२१५३ | २८,९७,६०० |
| ५. | लातूर | रेणापूर | १०९८४२०५ | ८६९२४०८ | ८,००,००० |
| ६. | लातूर | टाका | ११२८५४३३ | ६५४७७८५ | २४,००,००० |
| ७. | लातूर | अहमदपूर | १११२१००० | ६६६८१५० | १०,९४,१२३ |
| | एकूण | | | | १९१९१७२३ |
| | एकूण रू.एक कोटी एक्क्यान्नव लाख एक्क्यान्नव हजार सातशे तेवीस फक्त | | | | |

२. उपरोक्त खर्च "मागणी क्र.एम-४, मुख्यलेखाशिर्ष '४४०८, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक यावरील भांडवली खर्च ०१/ अन्न १०१ प्रापण व पुरवठा, ०२ अन्न साठवणूक व वखार साठवणूक १०१, ग्रामीण गोदाम कार्य़क्रम, (०१) नवीन गोदामांचे बांधकाम (०१)(०१) नवीन गोदामांचे बांधकाम (मुफसल)(योजनेंतर्गत) (४४०८ ०२४६), ५३ मोठी बांधकामे" या लेखाशिर्षांतर्गत व सन २०१६-१७ या वित्तीय वर्षात उपलब्ध करून देण्यात आलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा. वरील प्रमाणे निधी काढून घेण्याची व पुन:वितरीत करण्याची कार्यवाही वित्तीय सल्लागार व उपसचिव यांच्यामार्फत करण्यात यावी.

३. वरीलप्रमाणे निधी उपलब्ध करुन दिलेल्या शासकीय गोदाम बांधकामाची कामे तातडीने पूर्ण करण्यात यावी.गोदाम बांधकाम सुरू झाल्यांतर प्रथम बांधकामाचा संपूर्ण तपशिल तसेच संबंधित बांधकामाचा दरमहा आढावा घेऊन बांधकामाची प्रगती, जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी शासनास सादर करावी.

**४. सदरील शासकीय गोदाम बांधकामाची कामे पूर्ण होताच त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करण्याची दक्षता जिल्हा पुरवठा अधिकारी यांनी घ्यावी. गोदामासाठी निधी प्रत्यक्ष खर्ची होताच संबंधित कामासाठी एकूण वितरीत निधीच्या विनियोगाचे उपयोगिता प्रमाणपत्र त्वरीत शासनास सादर करावे.**

५. बांधकामास विलंब अथवा इतर कारणानी गोदाम बांधकामास वाढीव खर्च होणार नाही याबाबत दक्षता घ्यावी.

६. सदर गोदामांचे बांधकामाचे काम प्रगतीपथावर असताना संबंधीत अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बाधंकाम विभाग यांनी कमीत कमी तीन वेळेस भेट देऊन कामाची गुणवत्ता उत्कृष्ट असल्याची खातरजमा करावी व तसा अहवाल जिल्हाधिकारी यांना वेळोवेळी लेखी स्वरूपात सादर करावा.

७. गोदामाचे बांधकाम पूर्ण झाल्यानंतर गोदामाचा ताबा घेण्यापूर्वी सदर गोदामास जिल्हाधिकारी यांनी स्वतः भेट देऊन झालेले काम हे उत्कृष्ट दर्जाचे असल्याबाबत खातरजमा करावी. काही त्रुटी राहून गेल्या असल्यास त्याची पूर्तता सार्वजनिक बांधकाम विभागाकडून करून घ्यावी व त्याचा स्थळ निरीक्षणाचा अहवाल अभिलेखामध्ये जतन करून ठेवावा.

८. सदरचे आदेश प्राप्त होताच सदरील तरतुद जिल्हाधिकाऱ्यांमार्फत तात्काळ सार्वजनिक बांधकाम विभागाच्या संबंधित कार्यकारी अभियंता यांना अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात यावी. धनादेशाने आहरीत करण्यात येऊ नये.

**९. सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी दि.१५ मार्च,२०१७ अखेर खर्ची टाकावा. सदर आदेशान्वये उपलब्ध करुन देण्यात आलेला ठेव अंशदान म्हणून वर्ग करता येणार नाही.**

१०. संदर्भाधीन शासन निर्णय वित्त विभाग दिनांक २५.८.२०१५ मधील मुद्या क्र. (ड) चे तंतोतंत पालन करावे.

११. संबधित गोदाम बांधकामासाठी प्रशासकीय मान्यता आदेशानुसारच्या छाननीअंती सुधारित अंदाजित खर्चापेक्षा अधिक निधी वितरित होणार नाही याबाबत संबधित जिल्हा पुरवठा अधिकारी/अन्नधान्य वितरण अधिकारी यांनी दक्षता घ्यावी.

**१२. वरीलप्रमाणे वितरीत करण्यात आलेले अनुदान दि.१५ मार्च,२०१७ पर्यंत खर्च करण्यात यावे. उक्त दिनांकापर्यंत वरील निधी खर्च न झाल्यास अन्य गोदाम बांधकामास वळती करण्यात येईल याची नोंद घ्यावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी जिल्हा पुरवठा अधिकारी यांची राहील.**

१३. वित्तीय अधिकार नियम पुस्तीका १९७८ च्या भाग-१ ,उप विभाग ५ मधील अनुक्रमांक-१ नुसार व महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियम पुस्तीकेतील परिच्छेद क्रमांक-१३४ नुसार प्रशासनिक विभागास वित्तीय अधिकारानुसार सदरचा आदेश निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३१४१६४९५१३८०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sunil Deoman Baswant

Digitally signed by Sunil Deoman Baswant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=F.C.S and C.P. Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8883fe608dc825b4f80204357f8a6fadfe8507e0636b91f3c5fefef9c43acfe1, cn=Sunil Deoman Baswant
Date: 2017.03.14 16:51:31 +05'30'

**( सु.दे.बसवंत )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. जिल्हाधिकारी, सिंधुदूर्ग, धुळे, रायगड व लातूर.
३. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई, औरंगाबाद, नाशिक.
४. उपसचिव (नापु-१६ब), अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई

५. वित्तीय सल्लागार व उपसचिव कार्यालय, अन्न नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.
६. उप आयुक्त (पुरवठा), कोकण, औरंगाबाद, नाशिक
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सिंधुदूर्ग, धुळे, रायगड व लातूर.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सिंधुदूर्ग, धुळे, रायगड व लातूर.
९. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
१०. महालेखापाल-१/२, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर.
११. निवासी लेखा अधिकारी, मुंबई (वित्तीय सल्लागार व उपसचिव मार्फत)
१२. वित्त विभाग (व्यय-४, अर्थोपाय,अर्थबळ व अर्थसंकल्प-१६), मंत्रालय, मुंबई.
१३. नियोजन विभाग (का-१४११), मंत्रालय, मुंबई.
१४. सहाय्यक संचालक (संगणक) लेखा व कोषागारे, मुंबई/नागपूर.
१५. उपमहाव्यवस्थापक,नाबार्ड,५४,वेलस्ली रोड,शिवाजीनगर पुणे ४११००५.
१६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ग्रंथालय ६ वा मजला, विधानभवन, मुंबई. (१० प्रती)
१७. निवड नस्ती/नापु-१६ब.